आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता या योजनेंतर्गत निधी वितरण. (लेखाशीर्ष २२२५ एफ १०२)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र.२/ कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : - २७ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३, दि.५.०२.२०२४ व दि.४.०३.२०२४.
२) शासन ज्ञापन, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०२३/ प्र.क्र.०२/ का-०६, दि. .०१.२०२४.
३) आदिवासी विकास विभागाची ई-ऑफिस फाईल क्र. मसैशा-२०२४/प्र.क्र.१३/का-१२.

**प्रस्तावना :-**

सैनिकी शाळा, चंद्रपुर मु. भिवकुंड, पो. विसापूर, ता. बल्लारपूर, जि. चंद्रपूर येथे शिक्षण घेत असलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता अदा करण्याच्या अनुषंगाने शासनास प्राप्त प्रस्तावास अनुसरून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाद्वारे निधी उपलब्ध करून देण्याबाबत वित्त विभागाच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करण्यात आला होता. वित्त विभागाने सदर प्रस्तावास दिलेल्या मान्यतेस अनुसरून संदर्भाधीन क्रमांक २ येथील ज्ञापनान्वये पुनर्विनियोजित निधी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ याखालील मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, मधील सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता या योजनेंतर्गत सैनिकी शाळा, चंद्रपुर मु. भिवकुंड, पो. विसापूर, ता. बल्लारपूर, जि. चंद्रपूर येथे शिक्षण घेत असलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता अदा करण्याकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध तरतूदीतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रू.हजारात)

| अ. क्र. | योजनेचे नांव व लेखाशीर्ष | बाब क्रमांक | सन २०२३-२४ सुधारीत अंदाज | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | (०१)(७१) सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता (२२२५ एफ१०२) | ३४-शिष्यवृत्ती व विद्यावेतने | २९४०.०० | १११०.१६७ |

२. उपरोक्त प्रमाणे रु.१११०.१६७ हजार (अक्षरी रुपये अकरा लाख दहा हजार एकशे सदुसष्ट फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला असून निधी संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्यात यावा. सदर निधी खर्च करतांना संबंधितांमार्फत राज्यशासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेमधील विहीत तरतुदी व अटी शर्तींचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व ई-ऑफिस फाईल क्र. नस्ती क्र.मसैशा-२०२४/प्र.क्र.१३/का-१२ वर दि.२६.०३.२०२४ रोजी दर्शविलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२११०२४४८४८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2024.03.27 19:02:58 +05'30'

**(किरण कि.पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपुर.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ चंद्रपुर.
९. कक्ष अधिकारी (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.